**उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळाच्या कार्यकक्षेतील जिल्हा परिषद प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी, गट-अ च्या एकूण ८२ अस्थाई पदांना मुदतवाढ.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.१३९/आरोग्य-४

मंत्रालय,१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,मुंबई-४०० ०३२
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ३ जुलै, २०१५.

वाचा

१) **शासन निर्णय, सा.आ.वि.,क्रमांकः आरएलएच-१२८७/२१४/ आरोग्य-४, दि.१६.११.१९८७.**
२) **शासन निर्णय, सा.आ.वि.,क्रमांकः पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि.६.०८.२००७.**
३) **शासन निर्णय, सा.आ.वि. क्र. अस्थाई-२०११/प्र.क्र.११४/आरोग्य-४, दि.२०.०५.२०११.**
४) **शासन निर्णय, सा.आ.वि.,क्र. अपदे-२०१४/प्र.क्र.१०७/आरोग्य-४, दि.१५.०५.२०१४.**
५) **सहसंचालक, आरोग्य सेवा,प्रा.आ.कें. (जिपस्तर), मुंबई यांचे पत्र,क्र. संआसे/कक्ष ७-अ/टे-५/ अस्थाई पदे/ वै.अ./२०१५/२१७६-७८, दि.१७.०६.२०१५.**

प्रस्तावना

उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळातील ४०१ अस्थाई पदांपैकी ८० टक्के पदांच्या स्थायीकरणास उपरोक्त क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. उर्वरीत अस्थाई पदांपैकी लातूर मंडळातील जिल्हा परिषदांकडील प्राथमिक आरोग्य केंद्रांतील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या ८२ अस्थाई पदे विभागाच्या आकृतीबंधात समाविष्ट आहेत. या ८२ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये दिनांक १.०३.२०१४ ते दिनांक २८.०२.२०१५ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर पदांना दिनांक १.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळाच्या कार्यकक्षेतील जिल्हा परिषदांच्या प्राथमिक आरोग्य केंद्रातील सोबतच्या विवरणपत्रातील वैद्यकीय अधिकारी ( गट-अ ) ची एकूण ८२ अस्थाई पदे दिनांक १.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ या कालावधीपर्यंत सुरू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. ही पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त नव्हती वा या पदांचा अतिरिक्त कार्यभार दिलेला नाही या अटीच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे. यापैकी

एकही पद रिक्त असल्याचे आढळून आल्यास त्याची संपुर्णत: जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांची राहील.

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक-१ मधील मुख्य लेखाशीर्ष " २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, (०१) (०४)-गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ ) (२००४ )/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०३११२९०६५३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.07.04 16:16:54 +05'30'

(अ. ता.उईके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, प्रा.आ.केंद्र (जि.प.स्तर ), मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, बीड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, बीड.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, बीड.
१०. वित्त विभाग ( व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३ / अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).